<u>पदवीधर शिक्षकांची ज्येष्ठतासूचीबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकिर्ण -२०१६/प्र.क्र.३२०/टिएनटी-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०१७.

**<u>वाचा :-</u> शासन परिपत्रक शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. वेतन-१२१६/ प्र.क्र.१२३/१६/ टिएनटी-३, दिनांक १३.१०.२०१६**

**<u>प्रस्तावना</u> :-**

इयत्ता ६ वी ते ८ वी च्या वर्गावरील शिक्षकांना द्यावयाच्या वेतनश्रेणी संदर्भात आवश्यक सूचना संदर्भाधीन परिपत्रकान्वये सर्वांच्या निदर्शनास आणण्यात आल्या आहेत. या शासन परिपत्रकाच्या परिच्छेद - ५ मध्ये पदवीधर शिक्षकांच्या जेष्ठता याद्या मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशाप्रमाणे करण्यात याव्यात, असे नमुद करण्यात आले आहे. हे निर्देश अधिक सुस्पष्टपणे निदर्शनास आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रक</u> :-**

संदर्भाधीन शासन परिपत्रकाच्या परिच्छेद-५ मध्ये नमुद केल्याप्रमाणे प्रशिक्षित पदवीधर शिक्षक याचा अर्थ कोणत्याही शाखेतील पदवीधर अधिक डी. एड. किंवा बी. एड. असा आहे. सेवेत रुजू होताना १० वी अथवा १२ वी आणि डी. एड. अशी अर्हता धारक असणाऱ्या शिक्षकांनी सेवेत कार्यरत असताना पदवी प्राप्त केली असल्यास त्या शिक्षकांना सुध्दा प्रशिक्षित पदवीधर समजण्यात येते. असे असले तरी इयत्ता ६ वी ते ८ वी च्या वर्गांना शिकविण्याऱ्या पदवीधर शिक्षकांची अर्हता कोणत्या विषयातील असावी, याबाबत स्पष्ट आदेश असल्याने (विज्ञान /भाषा / सामाजिक शास्त्र) त्यानुसार विषय-निहाय पदवीधर शिक्षकांची जेष्ठतायादी ठेवणे क्रमप्राप्त आहे. अशाप्रकारे जेष्ठता याद्या ठेवताना मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी याचिका क्रमांक २२८०/१९९७, २३५६/१९९७, ४०३५/२०१०, २३४९/२०११, ६२४४/२०११, ३०८१/२०१२, ४१८५/२०१२ सहीत इतर अनेक प्रकरणामध्ये एकत्रित निकालात नमुद केल्याप्रमाणे कार्यपध्दती अवलंबण्यात यावी. त्याचे सूत्र खालील प्रमाणे राहील :-

१) पदवी अर्हता प्राप्त केल्या शिवाय उमेदवार विषय निहाय पदवीधर जेष्ठता यादी मध्ये स्थान प्राप्त करणार नाही.
२) पदवीधर प्राथमिक शिक्षकांची जेष्ठता यादी करताना त्याने पदवी कोणत्या दिनांकाला प्राप्त केली हे विचारात न घेता त्यांच्या मुळ नियुक्तीच्या दिनांकास त्यांची जेष्ठता निश्चित करावी.
३) संचमान्यता मंजूर करताना पदवीधर शिक्षक संख्येत कपात करावी लागत असेल तर महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती ) नियमावलीतील नियम २७ (इ) येथील तरतूद विचारात घेऊन विषयनिहाय ज्येष्ठता यादीतील कनिष्ठतम शिक्षक अतिरिक्त ठरेल.

४) पदोन्नतीकरिता पदवीधर अथवा विषयनिहाय शिक्षकांच्या जेष्ठतासूचीऐवजी महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी ( सेवेच्या शर्ती ) नियमावली जोडपत्र “फ” मधील तरतूदीनुसार सामाईक जेष्ठतासूची ग्राहय धरण्यात यावी.

उपरोक्त सूत्राचा अवलंब करुन जेष्ठता याद्या अद्ययावत करण्याची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१७१८४२८०२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.01.25 17:17:02 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व),
५. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. निवड नस्ती, टिएनटी-१.